महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वेतन व भत्त्यापोटी सहायक अनुदान वितरीत करण्याबाबत
(अनिवार्य) (२२१५A०४१),
३६, सहायक अनुदाने (वेतन).

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४१९/प्र.क्र.५५/पापु-२३**
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
तारीख: १७ फेब्रुवारी, २०२०

**वाचा :-**

१) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः मजीप्रा-२०१४/प्र.क्र.३३(अ)/पापु-२३, दिनांक २३.०३.२०१७.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक १.४.२०१९
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ८.७.२०१९
४) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग समक्रमांकः बजेट-१४१९/प्र.क्र.५५/पापु-२३, दिनांक १८.६.२०१९, ३०.८.२०१९ व २४.९.२०१९
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक २२.१.२०२०
६) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः बजेट-१४१९/प्र.क्र.५५/पापु-२३, दिनांक २४.१.२०२०

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते अदा करण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला अनुदान म्हणून २२१५A०४१ या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष सन २०१९-२० करिता प्राधिकरणाला रुपये १४४,९२,००,०००/- इतका निधी वाचा मधील अनुक्रमांक ४ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. तसेच दिनांक २३.३.२०१७ ते ३०.११.२०१७ पर्यन्तच्या वेतनभत्तेची थकबाकी अदा करणेसाठी प्राधिकरणास हिवाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेला रु.६५,००,००,०००/- इतका निधी वाचा मधील अनुक्रमांक ६ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. आता उपरोक्त लेखाशिर्षांतर्गत माहे फेब्रुवारी देय मार्च पर्यन्तच्या वेतन व भत्तेसाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय:-

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला अनुदान म्हणून "मागणी क्रमांक - वाय २, २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा ००१, संचालन व प्रशासन (०१) आस्थापना (०१)(०४) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वेतन व भत्त्यापोटी सहायक अनुदान, (अनिवार्य/दत्तमत) (२२१५A०४१), ३६, सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशीर्षांतर्गत रुपये ३५,२६,२४,०००/- (अक्षरी रुपये पस्तीस कोटी सव्वीस लाख चोवीस हजार फक्त) एवढे अनुदान माहे मार्चपर्यन्तच्या वेतन व भत्तेसाठी खालील अटींच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे.

अ) या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या नियमित आस्थापनेवरील कर्मचा-यांच्या सन २०१९-२० मधील वेतनभत्त्यासाठी वापरण्यात यावा. वेतनभत्त्यांच्या यापूर्वीच्या कोणत्याही थकबाकीसाठी या निधीचा वापर करु नये. या निधीचा अन्य बाबींवरील खर्च (विनियोग) ही वित्तीय अनियमितता समजण्यात येईल व अशा कृतीसाठी संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र राहतील.

ब) सन २०१९-२० मध्ये मार्च, २०२० अखेर प्राधिकरणाकडे जमा झालेले तांत्रिक शुल्क व ईटीपी चार्जेस शासनाकडे त्वरीत जमा करावेत. तसेच डिसेंबर,२०१९ अखेर जमा होणारे शुल्क ५ जानेवारी पूर्वी व जानेवारी, २०२० अखेर जमा होणारे शुल्क ५ फेब्रुवारी पूर्वी शासनाकडे जमा करावे.

२. या शासन निर्णयान्वये वितरीत केलेली रक्कम प्राप्त करुन घेण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक (वित्त), श्री.य.बा.पाटील, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून तर श्री.अभय महाजन, भा.प्र.से., उप सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. शासनाद्वारे देण्यात येणारे वेतन अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत वेतन अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व Offline पद्धतीने वितरीत करण्यात येऊ नये.

४. सदर रकमेच्या प्रत्यक्ष खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी सादर करावे. उपयोगिता प्रमाणपत्र सादर करताना कर्मचारीनिहाय प्रत्यक्ष वितरीत रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

५. प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च "मागणी क्रमांक - वाय २, २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा ००१, संचालन व प्रशासन (०१) आस्थापना (०१)(०४) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वेतन व भत्त्यापोटी सहायक अनुदान, (अनिवार्य/दत्तमत) (२२१५A०४१), ३६, सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०१९-२० च्या मंजूर आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०१९/ प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक १ एप्रिल, २०१९ तसेच शासन परिपत्रक समक्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ८ जुलै, २०१९ व दिनांक २२ जानेवारी, २०२० अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारात सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहेत. या परिपत्रकान्वये नमूद केलेल्या अटी व शर्तींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२१५१४५४२७५४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2020.02.17 17:46:23 +05'30'

**( चेतन निकम )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
३. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)

४. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
६. मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
७. अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई
८. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थ-१८), मंत्रालय, मुंबई
९. कक्ष अधिकारी, पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. निवड नस्ती कार्यासन पापु-२३